**विद्यापीठाच्या प्रथम वर्गामध्ये प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला-मुलींनी स्थानिक स्वराज्य संस्थांना भेट देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण २०१६/प्र.क्र. ६८३/१६, विशि-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. २७ जुलै, २०१८.

**<u>वाचा</u>** - उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र. ६८३/१६, विशि-३, दि. २३ डिसेंबर, २०१६

**<u>विषय</u>**:- विद्यापीठाच्या प्रथम वर्गामध्ये प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला-मुलींनी स्थानिक स्वराज्य संस्थांना भेट देण्याबाबत.

आपल्या देशाने त्रिस्तरीय लोकशाही पध्दती स्वीकारली असून, १८ वर्षावरील सर्व व्यक्तींना संविधानाने मतदानाचा व तसेच निरनिराळया संस्थांच्या सभासदांसाठी उभे राहण्याचा हक्क दिलेला आहे.

२. ७३ व ७४ व्या घटना दुरूस्तीनंतर स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका (महानगर पालिका, नगरपरिषदा/ नगरपंचायती, जिल्हा परिषदा/पंचायत समित्या, ग्रामपंचायती) राज्य निवडणुक आयोगामार्फतघेताना खालील बाबी प्रकर्षाने निदर्शनास आलेल्या आहेत:-

i) वयाची १८ वर्षे ओलांडल्यानंतर त्यांचे नाव मतदार यादीमध्ये नोंदविणे अपेक्षित आहे, याबाबत मुला-मुलींना माहिती नसणे व

ii) १८ वर्षे वयाच्या मुला-मुलींना "लोकशाही", निवडणुक व सुशासन" या विषयाची विशेष माहिती नसणे.

३. या दोन्ही विषयाबाबत राज्य शासनाने गेल्या दोन वर्षामध्ये राज्य निवडणुक आयोगाच्या सूचनांप्रमाणे खालीलप्रमाणे अनेक पावले उचलली आहेत.

(i) विद्यापीठाच्या प्रथम वर्गाच्या प्रवेश अर्जामध्ये दुरूस्ती करणे- प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला-मुलींनी प्रवेश अर्जामध्ये खालील आशयाची प्रमाणपत्र देणे- आवश्यक करण्यात आलेले आहे:-

" १८ वर्षे पूर्ण झाल्याबरोबर मी माझे नाव मतदार यादीत नोंदवून घेणार आहे"

(शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.६८३/१६/विशि-३, दिनांक १५ मे, २०१७.

वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.१३५/१७/शिक्षण-१, दिनांक २ जून, २०१७.

कृषी व पदुम विभाग क्रमांक-मपवि-२०१७/प्र.क्र.३७/माफसु, दिनांक ५ मे, २०१७)

(ii) विद्यापीठाच्या प्रथम वर्गामध्ये प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला-मुलींना सर्व विषयाचे Foundation course मध्ये "लोकशाही, निवडणुका व सुशासन" याबाबतचे Module परिचय अनिवार्य करणे.

४. या दोन्ही विषयावर सर्व विद्यापीठे, त्यांच्या अधिनस्त सर्व महाविद्यालये व तसेच निवडणुकीशी निगडीत सर्व यंत्रणा (उदा. जिल्हाधिकारी, मनपा आयुक्त, मतदार नोंदणी अधिकारी, इत्यादी) यांनी कार्यवाही सुरू केली असावी, अशी धारणा आहे. ह्यामुळे प्रथम वर्गामध्ये प्रवेश घेणाऱ्या मुला-मुलींना "लोकशाही, निवडणुक व सुशासन" याबाबत थोडीफार माहिती उपलब्ध होईल, असा विश्वास वाटतो.

५. ह्याच्या पुढील पाऊल म्हणून सर्व मुला-मुलींना त्यांच्या जवळपासच्या स्थानिक स्वराज्य संस्थांना भेटी देऊन निवडणुकीच्या कामकाजाविषयी माहिती देणे योग्य ठरेल. ही बाब लक्षात घेता शासन खालीलप्रमाणे आदेश पारीत करीत आहे:-

**शासन आदेश:-**

(i) विद्यापीठाच्या प्रथम व तत्सम वर्गामध्ये प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला-मुलींना (मेडीकल इंजिनिअरींग, पॉलिटेक्निक, आयटीआय इत्यादीसह) त्यांच्या जवळपासच्या स्थानिक स्वराज्य संस्थांना भेट देता यावी यासाठी विद्यापीठे व त्यांच्या अधिनस्त सर्व महाविद्यालयांनी जिल्हापरिषद, महानगरपालिका, पंचायत समिती, नगरपरिषद, नगरपंचायत, ग्रामपंचायत इत्यादी व त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालयांशी संपर्क साधून भेटीचा आराखडा तयार करावा.

(ii) यासाठी कुलगुरू/ कुलसचिव यांनी विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, महानगरपालिका आयुक्त, मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी संपर्क साधून बैठक घेऊन कार्यक्रमाचा आराखडा तयार करावा.

(iii) मुला-मुलींना त्यांच्या घराजवळच्या स्थानिक स्वराज्य संस्थांना सहजपणे भेट देता येईल, अशा प्रकारे आयोजन करण्यात यावे.

(iv) या भेटीद्वारे सर्व मुला-मुलींना संविधान व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अधिनियमातील तरतुदी यासोबतच प्रत्यक्ष कामकाज पाहण्याची संधी उपलब्ध करून देण्यात यावी.

५. सदर कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी विभागीय आयुक्त तसेच विद्यापीठांचे कुलगुरू यांनी पुढाकार घ्यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१८०७२७१७३६३२८६०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.08.06 13:10:41 +05'30'

**(सिध्दार्थ खरात)**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा.आयुक्त,राज्य निवडणुक आयोग, महाराष्ट्र राज्य
२. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुंबई.
४. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे.
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
९. सर्व जिल्हापरिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१०.सर्व मंत्रालयीन विभाग.
११.सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.मा.मंत्री (उ व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.मा.राज्यमंत्री (उ व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४.मा. अपर मुख्य सचिव (उ व तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५.सहसचिव (उ व तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६.उपसचिव (मशि/तांशि/साशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती.